दक्षिण मध्य क्षेत्र सांस्कृतिक केन्द्र, नागपुर
SOUTH CENTRAL ZONE CULTURAL CENTRE, NAGPUR
MINISTRY OF CULTURE, GOVT. OF INDIA

# मध्य-दक्षिणी वार्तापत्र

## { एप्रिल – जुलै 2018 }

 www.facebook.com/SCZCC/  www.twitter.com/SCZCC?lang=en  www.instagram.com/sczcc.nagpur/

# संचालकांचे मनोगत

दक्षिण मध्य क्षेत्र सांस्कृतिक केंद्रात मी संचालक म्हणून दिनांक १८ एप्रिल २०१८ रोजी कार्यभार स्वीकारला. यासाठी मी सर्वप्रथम महाराष्ट्राचे महामहिम राज्यपाल महोदय, केंद्रीय सांस्कृतिक मंत्री- नवी दिल्ली तसेच केंद्राच्या कार्यक्रम समितीचे अध्यक्ष व् महाराष्ट्राचे सांस्कृतिक मंत्री यांचे मन:पूर्वक आभार मानतो. महानिर्मिती या संस्थेच्या तांत्रिक कामांमधून मुक्त होऊन कला क्षेत्रात काम करण्याची  संधी मला मिळाली याचा मला खूप आनंद झाला आहे. मिळालेल्या संधीचे सोने करावे म्हणून मी आटोकाट प्रयत्न करणार आहे. या केंद्राच्या अधीन सध्या महाराष्ट्र, मध्यप्रदेश, छत्तीसगढ, आंध्रप्रदेश, कर्नाटक व तेलंगणा अशी एकूण सहा राज्ये आहेत. त्यामुळे काम प्रचंड आहे आणि सर्वांच्या अपेक्षाही खूप आहेत.

सध्या द.म. क्षे. सांस्कृतिक केंद्रात अनुभवी आणि जाणते कर्मचारी काम करीत आहेत. गेल्या अनेक वर्षांपासून ते येथे काम करीत असल्याने सर्वांना कामाची इत्थंभूत माहिती आहे. आपण सर्वजण मिळून एक चांगली चमू म्हणून येथे कार्य करू, नागपूरच्या सांस्कृतिक क्षेत्रात भरीव कामगिरी करून दाखवू, असे आवाहन मी सर्व कर्मचाऱ्यांना रुजू होताच केले होते आणि, त्याप्रमाणे मिळणारा प्रतिसादही उत्साहवर्धक आहे.

सर्व जुन्या आणि काही अप्रचलित कलांचे आपण पुनरुज्जीवन करावे, आदिवासी नृत्य प्रकारांना प्रोत्साहन द्यावे, महाराष्ट्रातील पोवाडा - लावणी - भारुड - जोगवा - वाघ्या मुरळी - दंढार - झाडीपट्टी अश्या सांस्कृतिक वैभवाचे दर्शन इतर राज्यांना घडवावे, तसेच इतर राज्यातील लुप्तप्राय होत असणाऱ्या कलागुणांना महाराष्ट्रात प्रोत्साहनपर संधी द्यावी असा माझा मानस आहे.

त्याचबरोबर अभिजात भारतीय संगीत, नाट्यसंगीत, चित्रकला, मूर्तिकला- पेंटिंग, छायाचित्रकला, उपशास्त्रीय गीतप्रकार यांचे देखील संवर्धन झाले पाहिजे. स्थानिक कलाकारांना कला सादरीकरणासाठी मंच उपलब्ध करून दिला पाहिजे. गडचिरोली, बस्तर सारख्या दुर्गम भागातील कलावंतांनाही न्याय मिळणे गरजेचे आहे. त्यादृष्टीने कार्यवाही सर्वांनी केली पाहिजे, असे माझे कार्यक्रम अधिकाऱ्यांना  आवाहन आहे.

कलाक्षेत्रात काम करीत असताना केंद्राच्या प्रत्येक कार्यक्रमात वृद्ध कलावंतांचा सन्मान करणे, केंद्राचे चांगले संकेतस्थळ तयार करणे, केंद्राची माहिती देणारा माहितीपट तयार करणे, केंद्राच्या जुन्या झालेल्या इमारतीच्या दुरुस्तीचे काम हाती घेणे, सध्या केंद्रातर्फे सुरु असणाऱ्या सर्व लोकप्रिय कार्यक्रमांचा दर्जा अधिक वाढवून कार्यक्रमांची संख्या देखील वाढविणे आणि अगदी तळागाळातील कलावंतांना देखील केंद्रातर्फे प्रोत्साहित करणे अशी विविधरुपी कार्यप्रणाली विकसित करण्याचा आपण प्रयत्न करणार आहोत.

या दर्जेदार सांस्कृतिक केंद्राला राष्ट्रीयच नव्हे तर आंतराष्ट्रीय स्तरावरील उंची गाठता यावी, या उद्देशाने आपण सर्वजण नेहमीच प्रयत्नशील राहूया. राष्ट्रनिर्मितीमध्ये सांस्कृतिक क्षेत्राचे महत्व असाधारण असते. म्हणून या सांस्कृतिक केंद्राचे पाईक होऊन राष्ट्रनिर्मितीच्या पवित्र कार्यात आपण आपले योगदान देऊया ! यासाठी सर्वांना मन:पूर्वक शुभेच्छा.

डॉ. दीपक खिरवडकर
**संचालक,**
दमक्षेसां. केंद्र, नागपूर

# दमक्षेसां. केंद्राद्वारे आयोजित / सहभाग नोंदवलेले कार्यक्रम आणि त्यांची क्षणचित्रे

'आनंदम' या मासिक योग शिबिराचे माहे एप्रिल, मे, जून, जुलै दरम्यान दररोज सकाळी ६:३० ते ७:३० वेळेत या दक्षिण मध्य क्षेत्र सांस्कृतिक केंद्राच्या मुख्यालय परिसरात आयोजन करण्यात आले. या शिबिराला नागरिकांचा उत्तम प्रतिसाद लाभतो आहे आणि त्याद्वारे योगकलेचे संवर्धन देखिल होत आहे.

## एप्रिल – 2018

## मासिक नाट्यप्रयोग

### अ] 'एकलव्य – बाघेली थियेटर'

१. केंद्राच्या 'मासिक नाटचप्रयोग' कार्यक्रमाअंतर्गत दिनांक २१ एप्रिल २०१८ रोजी 'एकलव्य - बाघेली थियेटर' चे सादरीकरण इन्द्रावती नाटचसमिति, सिधी (म.प्र.) यांच्याद्वारे शिल्पग्राम खजुराहो, (मध्यप्रदेश) येथे करण्यात आले. या नाटचप्रयोगात एकूण २० कलाकारांनी भूमिका साकारल्या.

## ब] मधुकर शाह – बुन्देली थियेटर

२. त्याचप्रमाणे दिनांक २२ एप्रिल २०१८ रोजी 'मधुकर शाह  बुन्देली थियेटर' चे सादरीकरण अन्वेशन थियेटर ग्रुप सागर (म.प्र.) यांच्याद्वारे 'शिल्पग्राम' खजुराहो, (मध्यप्रदेश) येथे करण्यात आले. या नाट्यप्रयोगात एकूण ३१ कलाकारांनी भाग घेतला. कार्यक्रमाच्या उद्घाटनप्रसंगी प्रसिद्ध अभिनेते श्री. गोविन्द नामदेव, श्री. नीरज कुंदर (दिग्दर्शक, इन्द्रावती नाटचसमिति), श्री. बृजेश सिंग (जेष्ठ मार्गदर्शक, इंडिया टुरीझम) आदी मान्यवर उपस्थित होते.

# मे 2018

१. दिनांक २ ते ७ मे २०१८ च्या दरम्यान इंदूर (म.प्र.) येथे 'माळवा उत्सवाचे' आयोजन करण्यात आले. यामधे 'कोळी नृत्य' (महाराष्ट्र) - श्री. अरविंद राजपूत आणि २० जणांचा समूह, 'गुस्साडी' (तेलंगाना) - श्री. डॉ. टी. मल्लेशम आणि १४ जणांचा समूह, 'पंथी नृत्य' (छत्तीसगढ) - श्री. मोहन चतुर्वेदी आणि १५ जणांचा समूह, 'सुगी कुनिथा' (कर्नाटक) - श्री. पी. गौडा आणि १५ जणांचा समूह असे विविध प्रादेशिक नृत्यप्रकार सादर करण्यात आले. ह्या नृत्यप्रकारंचे आयोजन लोक संस्कृति मंचातर्फे करण्यात आले होते.

२.दिनांक ४ ते ६ मे २०१८ च्या दरम्यान छायाचित्रण उन्हाळी शिबिराचे आयोजन दमक्षेसां. केंद्र मुख्यालय, नागपुर येथे करण्यात आले. युवक आणि किशोरवयीन प्रशिक्षणार्थिंनी या शिबिरात मोठ्या संख्येने उत्स्फूर्त सहभाग घेउन छायाचित्रण कलेचे धडे गिरवले. यामधे अगदी सेल्फी कशी काढावी इथपासून ते विवाहाचा व्हिडिओ कसा तयार करावा इत्यादि विषयावर मार्गदर्शन करण्यात आले.

३.भारत अणि स्वित्ज़रलैंड यांच्यातील मैत्रीपूर्ण संबंधांच्या ७० व्या वर्षपूर्ति निमित्त दिनांक ७ मे २०१८ रोजी केंद्र मुख्यालय नागपूर येथे दमक्षेसां. केंद्र व निर्झर सिनेक्लब यांच्या संयुक्त विद्यमाने 'स्विस फिल्म्स ऑन व्हील्स' या कार्यक्रमाचे आयोजन करण्यात आले. यामधे अलेन ग्स्पोनेर यांनी दिग्दर्शित केलेला 'हेईदी' हा १०५ मिनिटांचा चित्रपट प्रोजेक्टरच्या माध्यमातून केंद्र परिसरातील खुला मंच 'मुक्तांगण' येथे दाखविण्यात आला. सदर कार्यक्रमाला रसिक प्रेक्षक मोठ्या संख्येने उपस्थित होते.

४. दिनांक २२ ते २५ मे २०१८ च्या दरम्यान इम्फाळ (मणिपुर) येथे आयोजित २६ व्या 'राष्ट्रीय सर्वसामाजिक गुरु पूजा' कार्यक्रमात केंद्रातर्फे श्री. एम. बंजारे यांच्या नेतृत्वात १५ जणांच्या समुहाने छत्तीसगढचे 'पंथी नृत्य' सादर केले. तर श्री. पी. दूर्वे यांच्या नेतृत्वात १५ जणांच्या समुहाने मध्यप्रदेशचे 'गुदुम बाजा' हे नृत्य सादर केले.

५. संस्कृति मंत्रालय, भारत सरकार आणि उत्तर क्षेत्र सांस्कृतिक केंद्र, पतियाला यांच्या संयुक्त विद्यमाने 'राष्ट्रीय संस्कृति महोत्सवाचे' आयोजन गढवाल (उत्तराखंड) येथे २५ ते २७ मे २०१८ च्या दरम्यान करण्यात आले. या महोत्सवात केंद्रातर्फे 'महाराष्ट्रीयन हस्तकला आणि व्यंजन यांचे प्रदर्शन व विक्री स्टॉल' लावण्यात आले होते.

६. बहुजन रंगभूमीच्या वतीने 'नाटक आणि चित्रपट अभिनय कार्यशाळेचे' आयोजन २७ मे ते १ जून २०१८ च्या दरम्यान केंद्र मुख्यालय, नागपूर येथे करण्यात आले. या कार्यशाळेत एकूण ५५ कलावंतांनी सहभाग घेतला.

७. दिनांक २७ ते ३१ मे २०१८ च्या दरम्यान केंद्र मुख्यालय,नागपूर 'कत्थक कार्यशाळेचे' आयोजन करण्यात आले. या कार्यशाळेत श्रीमती संध्या पांडे-भार्गव यांनी प्रशिक्षणार्थींना मार्गदर्शन केले. सुमारे ८५ प्रशिक्षणार्थींनी या कार्यशाळेत सहभाग नोंदवला व कत्थक नृत्याचे धडे गिरवले.

# जून – 2018

१.दिनांक २ ते ३ जून २०१८ च्या दरम्यान मेनेझेस ब्रागन्झा, पणजी (गोवा) कर्नाटकी 'होर्नाडू' फेस्टिव्हलचे आयोजन करण्यात आले. दिनांक २ जूनला धारवाड़ (कर्नाटक) येथील श्री. मृत्युन्जय अगाड़ी आणि समूहाचे वाचनगायन, रामनगर (कर्नाटक) चे श्री बेवुर रमय्या आणि समूह यांचे लोकगीत, बेळगाव (कर्नाटक) चे श्रीमती राधाबाई मदारा आणि समूह यांचे 'चॉवडीके गीत', कर्नाटक येथील श्री मंजूनाथ आणि समूह यांचे 'तमातेवदन', श्री मदेश आणि समूह यांचे 'पूजा कुनीथा', श्रीमती गायत्री आणि समूह यांचे 'पाटा कुनीथा', श्री नवीन डीसी आणि समूह यांचे 'कोलाटा', श्री. एम. जी. मंजूनाथ यांचे 'कांगिलु नृत्य', श्री. सी. मंजूनाथ आणि समूह यांचे 'नगरीवादन', श्री. शिवलिंगाप्पा आणि समूह यांचे सोमण कुनीथा, श्री. भीमराया भजंत्री आणि समूह यांचे 'कराडी मजालु' आणि श्रीमती लिली सिद्धी आणि समूह यांचे 'सिद्धी दमाणी नृत्य' यांचे सादरीकरण झाले.

२. दिनांक ३ जूनला कर्नाटकचे श्री. पुट्टराजु आणि समूह यांचे 'थियेटर गान', श्री. आंबयानुल्ली आणि समूह यांचे 'सुगम संगीत', कर्नाटकचे श्री. ब्यादरल्ली शिवकुमार आणि समूह यांची 'लोकगीते', श्रीमती महादेवी देवरावर आणि समूह यांचे 'जिगीपाडा', श्री. गुंडू राजू आणि समूह यांचे 'तोगालु गोमबेयाता', श्री मनोजकुमार आणि समूह यांचे 'संबळ वादन', श्री. मंजाप्पा आणि समूह यांचे 'दोल्लू कुनिथा', श्री. लोकेश आणि समूह यांचे 'कोंबू कहाले', कुमारी एल. एम. संगीथा आणि समूह यांचे 'महिला वीरगेस', श्रीमती शारदा आणि समूह यांचे 'चिंदुडी नृत्य', श्री उमेश आणि समूहाचे 'गुमटे पंग', श्री. गुरुचरण आणि समूह यांचे 'कांगिलु नृत्य', श्री. बाळकृष्ण मूर्थी आणि समूह यांचे 'चिट मेला', श्री. शिवराज रामण्णा आणि समूह यांचे 'कराडीमाजलू', श्री. अशोक कुमार आणि समूह यांचे 'कामसेल नृत्य' आणि श्री शिकारी रामू आणि समूह यांचे 'हक्कीपिक्कीकुनीथा' यांचे सादरीकरण झाले.

३. दिनांक ५ जून २०१८ रोजी जागतिक पर्यावरण दिनाच्या निमित्ताने दमक्षेसां. मुख्यालय नागपूर येथे श्रीमती नंदाताई जिचकार (महापौर, नागपूर शहर), सौ. कांचन गडकरी (अध्यक्ष - संस्कार भारती, नागपूर), सौ. ज्योति बावनकुळे (समाजसेविका) आणि मा. गिरीश गांधी, अध्यक्ष - वनराई यांच्या हस्ते वृक्षारोपण करण्यात आले. तसेच दिनांक ६ जून २०१८ च्या शिवराज्यभिषेक प्रसंगाचे औचित्य साधून कु. स्वरा ठेंगडी हिने शिवाजी महाराजांच्या राज्यभिषेकाचे दृश्य एकांकिकेच्या स्वरूपात सादर केले.

४.दिनांक ५ जून २०१८ रोजी केंद्र मुख्यालय नागपूर येथे द्विदिवसीय व्यंगचित्र प्रदर्शनीचे आयोजन करण्यात आले. सदर प्रदर्शनीला कलाकार आणि रसिकांचा उत्तम प्रतिसाद लाभला.

५. दिनांक १३ ते १७ जून २०१८ च्या दरम्यान केंद्र मुख्यालय नागपूर येथे 'माती शिल्पकला कार्यशाळेचे' आयोजन करण्यात आले. कार्यशाळेचे उद्घाटन श्री. किरण पांडे, श्री. गिरीश गांधी अणि इतर मान्यवरांच्या हस्ते झाले. कार्यशाळेचे संचालक म्हणून प्रसिद्ध माती शिल्पकार श्री. चंद्रकांत चकोले यांनी प्रशिक्षणार्थींना मार्गदर्शन केले. एकूण १४० जणांनी सदर कार्यशाळेत आपला सहभाग नोंदवला.

६. दिनांक १९ जून २०१८ रोजी दमक्षेसां केंद्र, नागपूर आणि रेणूकादेवी मंदिर संस्थान माहुरगड (जिल्हा - नांदेड) यांच्या संयुक्त विद्यमाने माहुरगडावर गोंधळ महोत्सवाचे आयोजन करण्यात आले. कार्यक्रमाचे उद्घाटन श्री. चंद्रकांत घरोटे आणि यवतमाळ येथील मान्यवर पाहुण्यांच्या हस्ते करण्यात आले. या कार्यक्रमात परभणी चे श्री. भारत कदम आणि समूह यांनी गोंधळ, भारुड, जागर अशी पारंपारीक कला देवी मंदिर सभागृहात सादर केली. यात नागपूरच्या प्रसिद्ध नृत्यगुरु सौ. स्वाति भालेराव यांच्या शिष्यांनी नृत्यविष्कार देखिल सादर केला.

७.दिनांक २१ जून २०१८ रोजी संपूर्ण देशाप्रमाणेच दमक्षेसां केंद्र मुख्यालय, नागपूर येथे देखील ४ था आंतरराष्ट्रीय 'योग दिन'उत्साहात साजरा करण्यात आला. नागपूरच्या जनार्दन स्वामी योगाभ्यासी मंडळाचे श्री. घनश्याम प्रसाद वर्मा तसेच केंद्राचे संचालक डॉ. दीपक खिरवडकर यांच्या हस्ते दीपप्रज्वलन होऊन कार्यक्रमाचे उद्घाटन करण्यात आले. कार्यक्रमात सुमारे १५० नागरिकांनी योगाच्या विविध मुद्रा अणि आसने यांचा सराव केला.

८. दिनांक २३ ते २४ जून २०१८ रोजी केंद्र मुख्यालय नागपूर येथे वारली पेंटींग कार्यशालेचे आयोजन करण्यात आले. कार्यशाळेचे मुख्य मार्गदर्शक राष्ट्रीय पातळीवरचे चित्रकार श्री विजय बिस्वाल अणि इतर मान्यवरांच्या हस्ते कार्यशाळेचे उद्घाटन करण्यात आले. सहभागी प्रशिक्षणार्थींनी साडी, पेपर बॅग्स आणि कागद यांच्यावर सुंदर वारली पेंटिंग्ज साकारली.

९. दिनांक २० जून २०१८ रोजी केंद्र मुख्यालय, नागपूर येथे दमक्षेसां. केंद्र व ह्युमन्स ऑफ गोंडवाना यांच्या संयुक्त विद्यमाने गडचिरोली जिल्ह्यातील लोककला आणि आदिवासी संस्कृतीशी संबंधित चित्र प्रदर्शनी आणि लोकनृत्य यांच्या 'जोहार' या कार्यक्रमाचे आयोजन करण्यात आले. येथे चित्रप्रदर्शनी सोबतच 'रेला रे' या आदिवासी नृत्याचे आकर्षक सादरीकरण कलाकारांनी केले. या नृत्यामध्ये प्रेक्षकांनी देखील उत्स्फूर्त सहभाग घेतला हे विशेष.

# जुलै – 2018

१. दिनांक ८ जुलै २०१८ रोजी नागपुरातील जेष्ठ कलावंतांच्या सत्कार कार्यक्रमाचे आयोजन दमक्षेसां. केंद्र मुख्यालय हॉलमधे करण्यात आले. केंद्रीय रस्ते विकास आणि परिवहन मंत्री मा. श्री. नितिन गडकरी यांच्या हस्ते कलाक्षेत्राला वाहून घेतलेल्या कलावंतांना गौरविण्यात आले. याप्रसंगी माजी खासदार श्री. दत्ता मेघे, वनराईचे अध्यक्ष आणि माजी आमदार मा. श्री. गिरीश गांधी, केंद्राचे संचालक डॉ. दीपक खिरवडकर आदी मान्यवर उपस्थित होते. मान्यवरांच्या हते 'संगीत वैभव' या पुस्तकाचे अनावरण देखील करण्यात आले.

२. पुणे येथील प्रसिद्ध चित्रकार चिंतामणी हसबनीस यांची अभिनव कल्पना आणि निर्मिती असणाऱ्या'दिव्यांगांसाठीच्या (विशेष बालक) ऑडिओ टॅक्टईल चित्र प्रदर्शनीचे' आयोजन दिनांक १४ ते १६ जुलै २०१८ दरम्यान दमक्षेसां. केंद्र मुख्यालय, नागपूर येथे करण्यात आले. सदर प्रदर्शनीचे उदघाटन अगदी अनोख्या पद्धतीने नागपूरच्या महापौर सौ. नंदाताई जिचकार, उत्तर नागपूरचे आमदार मा. डॉ. मिलिंद माने आणि दमक्षेसां. केंद्राचे संचालक डॉ. दीपक खिरवडकर यांच्या हस्ते करण्यात आले. प्रदर्शनाला दिव्यांग बालकआणि इतर प्रेक्षकांचा उत्स्फूर्त प्रतिसाद लाभला. दिव्यांग (अंध) व्यक्तींना देखिल पेंटिंग्जचा आनंद घेता यावा यासाठी प्रत्येक पेंटींगवर ब्रेल लिपीत त्याचे वर्णन करण्यात आले होते. या अभिनव आणि नाविन्यपूर्ण उपक्रमाचे उपस्थितांनी भरभरून कौतुक केले.

३. दिनांक २२ जुलै २०१८ रोजी 'विठ्ठल नामाचा रे टाहो' या भक्तिगीतांच्या कार्यक्रमाचे आयोजन दमक्षेसां. केंद्राच्या वतीने साईन्टिफिक सभागृह, लक्ष्मीनगर नागपूर येथे करण्यात आले होते. आषाढी एकादशीच्या निमित्ताने आयोजित या कार्यक्रमाचे उद्‌घाटन महाराष्ट्र विधानपरिषदेचे आमदार मा. श्री अनिल सोले आणि दमक्षेसां. केंद्राचे संचालक डॉ. दीपक खिरवडकर यांनी केले. कार्यक्रमात अखंड भक्तिरसाने रसिक श्रोते न्हाऊन निघाले. केंद्राच्या कार्यक्रम समितीचे सदस्य श्री कुणाल गडेकर याप्रसंगी आवर्जून उपस्थित होते.

४. दिनांक २५ जुलै २०१८ रोजी प्रसिद्ध संगीतकार व गायक स्व. श्री सुधीर फडके उर्फ 'बाबूजी' यांच्या जन्मशताब्दी निमित्य त्यांना श्रद्धांजली म्हणून साईन्टिफिक सभागृह, नागपूर येथे 'तुझे गीत गाण्यासाठी' या संगीत कार्यक्रमाचे आयोजन दमक्षेसां. केंद्रातर्फे करण्यात आले. या कार्यक्रमात सुप्रसिद्ध गायक श्री. श्याम देशपांडे आणि स्थानिक गायक कलाकारांनी स्व. सुधीर फडके यांनी संगीतबद्ध केलेली आणि गायीलेली सुमधुर गीते सादर केली. कार्यक्रमाचे उद्‌घाटन महाराष्ट्र विधानपरिषदेचे आमदार मा. श्री. अनिल सोले यांनी केले. याप्रसंगी दमक्षेसां. केंद्राचे संचालक डॉ. दीपक खिरवडकर आणि इतर मान्यवर उपस्थित होते.

५. दिनांक २८ ते ३० जुलै २०१८ च्या दरम्यान प्रसिद्ध शास्त्रीय गायक आणि संगीतकार स्व. डॉ. वसंतराव देशपांडे यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ मागील २६ वर्षांपासून नित्यनेमाने आयोजित होणाऱ्या 'डॉ. वसंतराव देशपांडे स्मृती संगीत समारोहाचे 'भव्य आयोजन दमक्षेसां. केंद्रातर्फे करण्यात आले. समारोह डॉ. वसंतराव देशपांडे स्मृति सभागृहात संपन्न झाला. यंदा या समारोहाचे २७ वे वर्ष होते. समारोहामध्ये शास्त्रीय गायन, वादन आणि संगीतनाटकाची मेजवानी रसिकांनी अनुभवली.

## अ ] प्रथम सत्र दि. 28 जुलै 2018

समारोहाच्या उदघाटन कार्यक्रमाला प्रमुख पाहुणे म्हणून लाभलेल्या मा. श्री राजीव रानडे (अतिरिक्त कार्यकारी संचालक - एनएडीटी ), मा. श्री. अनिल सोले (आमदार - महा. विधानपरिषद ) यांच्या हस्ते दीपप्रज्वलन झाले. याप्रसंगी दमक्षेसां. केंद्राचे संचालक डॉ. दीपक खिरवडकर उपस्थित होते. यानंतर प्रमुख अतिथींच्या हस्ते नागपुरातील जेष्ठ कलाकारांच्या सत्कार कार्यक्रमात पं. चंद्रहास जोशी (जेष्ठ गायक आणि संगीतकार ) व श्री. राजू गुजर (जेष्ठ तबलावादक) यांना गौरविण्यात आले.

नागपूरच्या सौ. रेणुका देशकर यांच्या संकल्पनेतून साकारलेल्या 'सामवेदातून संगीत' कार्यक्रमात आंतरराष्ट्रीय ख्यातीच्या शास्त्रीय गायिका आरती अंकलीकर-टिकेकर यांनी उत्कृष्ट सादरीकरण करून रसिकांना मंत्रमुग्ध केले. त्यांना रुद्रवीणेवर हुबळीच्या ज्योती हेगडे, संवादिनीवर नागपूरचे श्रीकांत पिसे, तबल्यावर नागपूरचेच पं. संदेश पोपटकर, परभणीचे श्री. पळसकर गुरुजी (ऋचा गायन) यांची समर्थ साथ लाभली. या कार्यक्रमाचे लेखन व संशोधन औरंगाबादच्या डॉ. सुजाता व्यास यांचे होते तर संगीत संयोजन श्री. शैलेश दाणी यांनी केले. याप्रसंगी श्री. किशोर हंपीहोळी यांच्या शिष्यवर्गाद्वारे मनमोहक नृत्य सादर करण्यात आले.

## ब ] द्वितीय सत्र – दि. 29 जुलै 2018

समारोहाच्या द्वितीय दिवशीचे उद्घाटन मा. श्री. मनीष पितळे (न्यायमूर्ती, नागपूर खंडपीठ - मुंबई उच्च न्यायालय), पं. छबुराव भरणे (जेष्ठ तबलावादक) यांच्या शुभहस्ते करण्यात आले. यानंतर नागपूरच्या जेष्ठ कलावंतांच्या सत्कार कार्यक्रमात श्रीमती नंदिनी सहस्रबुद्धे (जेष्ठ सतार वादक), श्री. जगदीश टेकाडे (जेष्ठ सतार वादक), आणि श्रीमती शुभदा पेंढरकर (जेष्ठ महिला दिलरुबा वादक) यांना सन्मानित करण्यात आले.

यानंतर पुणे येथील प्रसिद्ध शास्त्रीय गायिका सावनी शेंडे-साठये यांनी विविध रागांमधील बंदिशी सादर करून कार्यक्रमात रंग भरले. त्यांना पं. अरुण गवई यांनी तबल्यावर तर संदीप गुरमुळे यांनी संवादिनीवर साथसंगत केली. सावनी शेंडे-साठये यांच्या मैफलीनंतर कोलकाता येथील आंतरराष्ट्रीय ख्यातीचे तबलावादक पं.शुभंकर बॅनर्जी यांचे एकल तबलावादन झाले. त्यांना श्री. हिरण्मय मित्र यांनी साथ केली. पं. बॅनर्जी यांच्या तबल्याच्या बनारस शैलीतील वादनाने त्यांनी रसिकांना मंत्रमुग्ध केले.

## क ] तृतीय सत्र – दि. 30 जुलै 2018

समारोहाच्या समारोपीय कार्यक्रमाच्या दिवशी श्री चंद्रगुप्त वर्णेकर, श्री. श्रीनिवासजी वर्णेकर व श्री. अमोल बावडेकर या मुख्य अतिथींच्या हस्ते दीपप्रज्वलन करण्यात आले. यानंतर नागपूरच्या जेष्ठ कलाकारांच्या सत्कार कार्यक्रमात आंतरराष्ट्रीय पातळीवरचे वरिष्ठ चित्रकार श्री. प्रमोद बाबू रामटेके, छत्तीसगढ येथील लोककला तथा नाटच कलाकार श्री. हेमंत वैष्णव व 'स्वराली' या महिलांसाठीच्या संगीत संस्थेच्या संचालिका सौ. नंदिनी सहस्त्रबुद्धे यांना गौरविण्यात आले.

यानंतर स्वातंत्र्यवीर सावरकर लिखित आणि मुंबई मराठी साहित्य संघ यांच्याद्वारे प्रस्तुत 'संन्यस्त  खड्ग' या संगीत नाटकाच्या प्रयोगाचे सादरीकरण झाले. आकर्षक मुद्राभिनय आणि उत्तम संवादशैली यांद्वारे कलाकारांनी रसिकांची मने जिंकली. कथेच्या ओघाने येणारी 'मर्मबंधातली ठेव ही', 'नारी विधी', 'माळ गुंफीताना', 'शतजन्म शोधिताना' ही सुविख्यात नाटचपदे आपल्या श्रवणीय आवाजात गाताना अभिनेता अमोल बावडेकर व अभिनेत्री संपदा माने यांनी रसिकांची प्रचंड दाद मिळविली. सदर नाटकाचे दिग्दर्शन श्री. प्रमोद पवार यांनी तर संगीत मा. दीनानाथ यांचे होते. प्रमुख भूमिका भारत चव्हाण (गौतम बुद्ध) ,संदीप सोमण (सेनापति विक्रम सिंह), आनंद पालव (राजा शुद्धोधन), संपदा माने (सुलोचना), अमोल बावडेकर (वल्लभ) आदींनी साकारल्या.

अश्या प्रकारे डॉ. वसंतराव देशपांडे यांच्या ३७ व्या पुण्यतिथीदिनी २७ व्या डॉ. वसंतराव देशपांडे स्मृती संगीत समारोहाचे यशस्वी समापन झाले. या समारोहास यंदा रसिकांची प्रचंड उपस्थिति लाभली आणि सर्वांनी या महोत्सवाची मुक्तकंठाने प्रशंसा केली.

या महोत्सवाच्या यशस्वितेसाठी केंद्राच्या सर्वश्री दिपक कुळकर्णी, प्रेमस्वरूप तिवारी, गोपाल बेतावार, शशांक दंडे, दिपक पाटील या कार्यक्रम अधिकाऱ्यांसोबत उपसंचालक मोहन पारखी व इतर कर्मचाऱ्यांनी देखील भरपूर परिश्रम केले.

